अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील सहसंचालक
गट-अ संवर्गातील अधिका-यांच्या बदलीबाबत.

# महाराष्ट्र शासन

**नियोजन विभाग,**

**शासन आदेश क्रमांक:- इएसटी-१११५/प्र.क्र.१२८/का-१४२७**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
६ वा मजला, विस्तार इमारत, मंत्रालय,
मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ०८ सप्टेंबर, २०१५

**शासन आदेश**

महाराष्ट्र शासकीय कर्मचा-यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणा-या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) (एक) नुसार अर्थ व सांख्यिकी संचालनालयातील सहसंचालक-गट `अ` संवर्गातील खाली नमूद अधिका-यांची सक्षम प्राधिका-याच्या मान्यतेने बदली करण्यात येत असून त्यांची पदस्थापना स्तंभ क्र.३ मध्ये दर्शविल्याप्रमाणे करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिका-याचे नांव, पदनाम व सध्याचे कार्यालय | बदलीनंतरचे पदनाम व कार्यालय |
|---|---|---|
| १ | २ | ३ |
| १. | श्री.ज.रा.सरनाईक, सहसंचालक नियुक्तीच्या प्रतिक्षेत | सहसंचालक (इ.आ.सं.कें.), अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई. |

२. श्री.सरनाईक यांनी बदली केलेल्या पदावर तात्काळ रूजू व्हावे व त्या पदाचा कार्यभार स्वीकारावा.

३. बदली आदेशात बदल करून घेण्यासाठी प्रत्यक्ष वा अप्रत्यक्षपणे दबाव आणण्याचा प्रयत्न केल्यास तो अधिकारी शिस्तभंगविषयक कारवाईसाठी पात्र ठरेल.

४. काही अधिकारी बदली आदेशाचे पालन करीत नाहीत. त्यामुळे प्रशासकीय कामकाजात अडथळा उत्पन्न होतो असे निदर्शनास आले आहे. यास्तव, वरील अधिका-यांनी त्यांना देय / अनुज्ञेय असलेल्या पदग्रहण अवधीतच बदलीच्या ठिकाणी रूजू व्हावे. याबाबत दिरंगाई झाल्याचे व शासन आदेशाचा भंग झाल्याचे निदर्शनास आल्यास संबंधिताविरूध्द शिस्तभंगाची कारवाई करण्यात येईल, याची नोंद घ्यावी.

५. बदली करण्यात आलेल्या अधिका-यांनी त्यांना कार्यमुक्त केल्याबाबतच्या आणि त्यांनी कार्यभार स्वीकारल्याच्या आदेशाची प्रत या विभागास अग्रेषित करावी.

६. बदली झालेले अधिकारी बदलीच्या कार्यालयात रुजू झाल्यानंतर त्यांनी तात्काळ संबंधित आहरण व संवितरण अधिकाऱ्यांशी संपर्क साधून ई-प्रोफाईल अद्ययावत करण्याची कार्यवाही सात दिवसांच्या आत करावी. अद्ययावत केलेले ई-प्रोफाईल संबंधित कार्यालयाने संबंधित अधिकाऱ्यांच्या त्या महिन्याच्या वेतन देयकासोबत

कोषागार कार्यालयास सादर केल्याशिवाय त्यांचे वेतन देयक कोषागार कार्यालयाने पारित करु नये. तसेच, अद्ययावत ई-प्रोफाईलच्या प्रती संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय व शासनास पाठविण्यात याव्यात. ई-प्रोफाईल अद्ययावत करण्याची जबाबदारी संबंधित कार्यालय प्रमुखांची राहील.

७. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक २०१५०९०८१०४०४२३६१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant Shankar Kulkarni

Digitally signed by Vasant Shankar Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Shankar Kulkarni
Date: 2015.09.09 13:22:53 +05'30'

( वसंत कुळकर्णी )
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र-१ व २ मुंबई/नागपूर.
२) मा.मुख्यमंत्री/मा.मंत्री (नियोजन)/मा.राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई.
३) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
४) सर्व सहसचिव/उपसचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) सहसंचालक, प्रादेशिक कार्यालय, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, कोकण विभाग / पुणे /नाशिक /औरंगाबाद /अमरावती /नागपूर.
६) उपायुक्त (नियोजन), विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग / पुणे /नाशिक /औरंगाबाद /अमरावती /नागपूर.
७) अपर मुख्य सचिव (नियोजन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
८) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
९) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०) श्री.ज.रा.सरनाईक, सहसंचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई.
११) लेखाधिकारी, लेखा शाखा, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई-४०० ०५१.(तीन प्रती)
१२) निवड नस्ती.